२०११०७०११४७३३००१

**पुणे शहर व उपनगरमधील वाहतुक व्यवस्थेचा प्रश्न निवारणार्थ समिती गठीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक:पीएमसी-३००७/१५६८/प्रक्र-२७४/०७/नवि-२२
मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक: १२ सप्टेंबर, २००७

**प्रस्तावना**:-

पुणे शहर, उपनगरांतील व परीसरातील दिवसेंदिवस वाढत जाणारी वाहनांची संख्या, त्यामुळे वाहतुक व्यवस्थेवर वाढलेला ताण, वाहतुक व्यवस्थेत निर्माण झालेल्या समस्या, वाढलेले अपघात, याबाबी लक्षात घेवून वाहतूक समस्यांचे निवारण करुन अपघांताची समस्या कायम स्वरुपी सोडविण्यासाठी एक उच्च स्तरीय समिती गठीत करण्याची मागणी जनतेतून ,तसेच विधी मंडळाचे अधिवेशनात उपस्थित करण्यात आली होती. त्या अनुषंगाने पुणे शहर, उपनगरातील व परिसरातील वाहतुक व्यवस्थेचा प्रश्न निवारणार्थ " "कायमस्वरुपी उच्चस्तरीय समिती" गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :** पुणे शहर ,उपनगरातील व परिसरातील सातत्याने वाढत्या वाहनांची संख्या व त्यामुळे निर्माण झालेली वाहतुकीची समस्या सोडविण्यासाठी पुढील प्रमाणे कायमस्वरुपी "उच्च स्तरीय समिती " गठीत करण्यास या आदेशाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा.अप्पर मुख्य सचिव, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | मा.प्रधान सचिव, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई | उपाध्यक्ष |
| ३ | मा.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई | सदस्य |
| ४ | मा.प्रधान सचिव ( परिवहन ) ,गृहविभाग,मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ५ | आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे | सदस्य सचिव |
| ६ | पोलीस आयुक्त, पुणे शहर , पूणे | सदस्य |
| ७ | आयुक्त,पिंपरी -चिंचवड महानगरपालिका,पुणे | सदस्य |
| ८ | पुणे शहरातील, पिंपरी-चिंचवडसह उपनगरातील सर्व स्थानिक विधान सभा सदस्य/विधान परिषद सदस्य | विशेष निमंत्रित |
| ९ | जिल्हाधिकारी, पुणे | सदस्य |

०२. सदर **उच्चस्तरीय समितीची कार्यकक्षा** पुढील प्रमाणे राहील:-
१) वाहतुकीच्या समस्येवर उपाययोजना शोधून त्यांच्याअंमलबजावणीसाठी मार्गदर्शन करणे,

२) वाहतुकीच्या समस्या सोडविण्यासाठी मोबीलीटी कमिटी, पोलीस उपायुक्तांची वाहतूक नियंत्रण समिती यांना मार्गदर्शन करणे

३) रस्ते रुंदीकरण , रस्ते दुरुस्ती, वाहनतळ व्यवस्था, भुयारी मार्ग, पादचारी मार्ग, रस्ते दुभाजक, यासह रस्त्यावरील अडथळे काढणे व वाहतुक सुरळीत होण्यासाठी चर्चा करुन मार्गदर्शन करणे.

४) वाहतुक समस्या निवारणार्थ इतर सर्व विषयांवर चर्चा करणे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुनिल कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२ माअप्पर मुख्य सचिव (नवि), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.प्रधान सचिव , नगर विकास विभाग , मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.प्रधान सचिव ( परिवहन ) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
७) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे
८) पोलीस आयुक्त, पुणे शहर, पुणे
९) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
१०) सर्व विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्य ( पुणे शहर, उपनगरेतील पिंपरी चिंचवड सह )
१०) निवडनस्ती ( नवि-२२)